**जिल्हा सैनिक कल्याण अधिका-यांना मंत्रालयीन अवर सचिव पदाची वेतनश्रेणी मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सैकवि-२०१४/९८४/(प्र.क्र.३४१/१४)/२८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि.२४ फेब्रुवारी २०१५

**वाचा :-**

**१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः रासैमं-१०८९/प्र.क्र.५४/८९/२८, दि.२६ नोव्हेंबर १९९७.**
**२) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः रासैमं-१०९५/२६७३/प्र.क्र.८९/९६/२८, दि.१० ऑक्टोबर,२००१.**
**३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांकःसैकवि-२००२/२७५७/प्र.क्र.३००/२००२/२८, दि.१९ सप्टेंबर, २००५.**
**४) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: सैकवि-२००८/प्र.क्र.३१२/का.२८, दि.७ मे, २०१०**
**५) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक:१२०७८/सैकवि-२/३५९८, दि.०५ सप्टेंबर, २०१४.**

**शासन निर्णय :-**

सैनिक कल्याण विभागाच्या अधिपत्याखालील, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी गट-अ या पदांना पदोन्नतीची संधी उपलब्ध नसल्यामुळे संदर्भाधीन अ.क.(१) येथील दिनांक २६.११.१९९७ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, गट-अ या संवर्गातील रुपये ७४५०-११५०० (सुधारित वेतनश्रेणी रु.९३००-३४८००) या वेतनश्रेणीतील एकूण पदसंख्येच्या १/३ अथवा जास्तीत जास्त आठ पदे श्रेणीवाढ करुन मंत्रालयीन अवर सचिव पदाच्या रुपये १००००-११५०० ( सुधारित वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००) या वेतनश्रेणीत रुपांतरीत करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार संदर्भाधीन अ.क्र.(२) व (४) येथील अनुक्रमे दिनांक १० ऑक्टोबर, २००१ व दिनांक ७ मे,२०१० च्या शासन निर्णयानुसार श्रेणीवाढ केलेल्या ८ जिल्हा सैनिक कल्याण अधिका-यांपैकी चार जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी नियत वयोमानानुसार सन २००७ ते २०१३ या कालावधीत सेवानिवृत्त झाल्यामुळे त्यांच्या रिक्त झालेल्या पदांवर जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी संवर्गातील खाली नमूद अधिका-यांना त्यांच्या नावांसमोर दर्शविलेल्या दिनांकापासून मंत्रालयीन अवर सचिव पदाची वेतनश्रेणी (पी.बी.३: रु.१५६००-३९१०० व ग्रेड पे रु.६६०० ) पूर्वलक्षी प्रभावाने मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा सैनिक कल्याण अधिकाऱ्याचे नाव | अवर सचिव पदाची वेतनश्रेणी लागू करण्याचा दिनांक व कालावधी |
|---|---|---|
| १. | माजी ले.कर्नल भरत रामकृष्ण फडणीस (दि. ३०/०६/२०१० रोजी सेवानिवृत्त) | दि. ०१/१२/२००७ पासून (दि. ०१/१२/२००७ ते ३०/०६/२०१० या कालावधी करीता) |
| २. | माजी मेजर सुहास दत्ताराम नाईक | दि.०१/०७/२०१० |
| ३. | माजी मेजर मिलिंद देवदत्त तुंगार | दि.०१/०९/२०११ |
| ४. | माजी ले.कर्नल सुभाष एकनाथ रोखले | दि.०१/१२/२०१२ |
| ५. | माजी कंमाडर मिलिंदकुमार म. बडगे | दि.०१/१०/२०१३ |

२. याबाबत होणारा खर्च, "मागणी क्रमांक ए-५ लेखाशीर्ष , २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००-इतर कार्यक्रम, (००) (०२) जिल्हा सैनिक कल्याण कार्यालये (२२३५ ००४२ ) ०१ - वेतन" आणि "मागणी क्रमांक ए-५ लेखाशीर्ष , २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००-इतर कार्यक्रम, (००) (०३) सैनिक कल्याण विभाग (२२३५ ००५१ ) ०१ - वेतन" या लेखाशिर्षामधून सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२४१५३३४५१००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradeep Darade
Date: 2015.02.24 15:43:10 +05'30'

(प्र.ल.दराडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (मासैक) यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे खाजगी सचिव,
३. सचिव व वि.चौ.अ. (१) यांचे स्वाय सहायक,
४. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे,
५. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता) -१, महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता ) -२, महाराष्ट्र , नागपूर,
७. महालेखापाल- (लेखा परिक्षा ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
८. महालेखापाल- (लेखा परिक्षा ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
९. वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१०. माजी ले.कर्नल भरत रामकृष्ण फडणीस, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी (सेवानिवृत्त),

११. माजी मेजर सुहास दत्ताराम नाईक, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जि. कोल्हापूर,
१२. माजी मेजर मिलिंद देवदत्त तुंगार, उपसंचालक (सैनिकीकरण), सै.क.वि., पुणे.
१३. माजी ले.कर्नल सुभाष एकनाथ रोखले, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जि. अहमदनगर.
१४. माजी कंमाडर मिलिंदकुमार म. बडगे, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जि. बुलढाणा.
१५. सर्व जिल्हा सैनिक कल्याण कार्यालये,
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७. निवडनस्ती (२ प्रती ).